**शासकीय सेवेच्या राजीनाम्यास मंजूरी देणेबाबत.**

श्रीमती सुचेता पराग नाईक, अधिव्याख्याता, महाराष्ट्र राज्य हॉटेल मॅनेजमेंट ॲन्ड कॅटरींग टेक्नॉलॉजी संस्था, पुणे.

**महाराष्ट्र शासन.**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.राजीमं-५२१४/प्र.क्र.७४/१४/तांशि-७**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ३१ मे, २०१७.**

पहा:- १) इन्स्टिट्युट ऑफ हॉटेल मॅनेजमेंट ॲन्ड केटरिंग टेक्नॉलॉजी, पुणे यांचे नियुक्ती पत्र क्र.IHMCT/SN/१२५७(A)/८९, दि.२१ ऑगस्ट, १९८९ व नियुक्ती पत्र क्र.IHMCT/SPN/९०/९१२०, दि.१९ जुलै, १९९०.

२) श्रीमती सुचेता पराग नाईक यांचा अर्ज दि. ०९/१२/२००९.

३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र. ४अ /आस्था/श्रीम.सुचेता नाईक राजीनामा स्विकृत२०१३-१४/१६१,दि.२४/०३/२०१४ व क्र. ४अ /आस्था/२०१६/६७२, दि.०७/७/२०१६ चे पत्र.

प्रस्तावना:-

श्रीमती सुचेता पराग नाईक, अधिव्याख्याता, महाराष्ट्र राज्य हॉटेल मॅनेजमेंट ॲन्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी, पुणे यांची दि.२०/९/१९८८ अन्वये हंगामी स्वरुपात नियुक्ती करण्यात आली. तसेच दि.२१/८/१९८९ च्या आदेशान्वये त्यांच्या सेवा नियमित केल्या असून दि.१९/०७/१९९० च्या आदेशान्वये त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला आहे.

२. श्रीमती नाईक यांना दि.२०/९/२००३ ते दि.२०/११/२००३ या कालावधीकरीता कॅनडा येथे जाण्यास संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी परवानगी दिली आहे. तदनंतर श्रीमती नाईक यांनी दि.२०/११/२००३ च्या अर्जान्वये प्रकृतीच्या कारणास्तव ३ महिने रजा वाढविण्याची विनंती केली आहे. तथापि, सदर ३ महिने कालावधीकरीता विहित नमून्यात रजा अर्ज व वैद्यकीय प्रमाणपत्रासह सादर केला नाही व तदनंतरही त्या संस्थेत रूजू झाल्या नाहीत. म्हणजेच दि.२१/११/२००३ पासून विनापरवानगी कर्तव्यावर अनुपस्थित आहेत. विनापरवानगी कर्तव्यावर अनुपस्थित असल्याने त्यांना दि.६ डिसेंबर,२००४ रोजी गैरहजेरीबाबत खुलासा मागवून त्यांचेविरूद्ध कारवाई का करू नये असे ज्ञापन देण्यात आले आहे. तसेच, संस्थेनेदेखील त्यांना कामावर रूजू होण्याबाबत पत्रव्यवहार केला असता पत्रे न स्विकारता संस्थेस परत आली आहेत. त्यामुळे त्यांच्या पत्त्याची चौकशी करण्याबाबत पोलीस आयुक्त, पुणे यांना विचारणा केली असता त्यांनी श्रीमती नाईक कुटुंबासह २ ते २.५ वर्षापासून कॅनडा येथे गेल्याचे त्या राहत असलेल्या सोसयटीतर्फ़े सांगण्यात आल्याचे पत्रान्वये कळविले आहे. तदनंतर त्वरीत कामावर हजर होण्याबाबत त्यांना कॅनडा येथील पत्त्यावरदेखील कळविले आहे.

३. तदनंतर श्रीमती नाईक यांनी दि.९ डिसेंबर,२००९ पत्रान्वये कायमस्वरूपी परदेशात राहण्याचे ठरविले असल्याने अधिव्याख्याता पदाचा राजीनामा स्विकारून सेवेतून कार्यमुक्त करण्याबाबत विनंती केली आहे. तसेच ०१ महिन्याची नोटीस न दिल्याने त्यांनी ०१ महिन्याचे मूळ वेतनापोटी रू. २०,३६३/- दि. ७/०१/२०१० रोजी शासन जमा केले आहेत. सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०९२/ १०३३/ प्र.क्र.३३ / ९२/८,दि. ०२ डिसेंबर, १९९७ मधील राजीनामा स्विकारण्यासंबधी अटीची पुर्तता होत असल्याने श्रीमती नाईक यांना दि.०७/१/२०१० (म.नं.) रोजी पासून सेवेतून कार्यमुक्त करण्यात आले आहे असे समजण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२/१२/१९९७ मधील मार्गदर्शक सूचना २(अ)८ नुसार श्रीमती सुचेता पराग नाईक, अधिव्याख्याता, महाराष्ट्र राज्य हॉटेल मॅनेजमेंट ॲन्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी, पुणे यांच्या दि.२१/११/२००३ ते दि.०६/०१/२०१० पर्यंतची गैरहजेरी ही “अनधिकृत गैरहजेरी” ठरवून तो कालावधी कोणत्याही सेवा प्रयोजनार्थ (निवृत्ती वेतन विषयक लाभासह) ग्राह्य धरण्यात येऊ नये या अटीच्या अधीन राहून २(अ)११ नुसार श्रीमती नाईक यांचा राजीनामा स्विकारून त्यांना दि.०७/०१/२०१० (म. नं.) पासून सेवेतून कार्यमुक्त केले आहे असे समजण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५३११६१९२८१९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.05.31 16:28:27 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती सुचेता पराग नाईक, अधिव्याख्याता, महाराष्ट्र राज्य हॉटेल मॅनेजमेंट ॲन्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी, पुणे (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत :**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, पुणे.
३. प्राचार्य, महाराष्ट्र राज्य हॉटेल मॅनेजमेंट ॲन्ड कॅटरिंग टेक्नॉलॉजी,पुणे. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
६. निवड नस्ती तांशि - ७